**राखीव वनाचे सर्व्हेक्षण, जमाबंदी व सिमांकन योजनेंतर्गत सन २०२३-२४ करिता निधी वितरीत करण्याबाबत.. (४४०६-००५३).**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- एस-१०/२०२३/प्र.क्र.१७४/फ-३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

दिनांक : ६ जुलै, २०२३.

वाचा :-

१. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. १२.०४.२०२३.

२. प्रधान मुख्य वनंसरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.- कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.१५/५१/२०२३-२४, दिनांक २५.०४.२०२३.

३. प्रधान मुख्य वनंसरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.१५/१९८/२०२३-२४, दिनांक १३.०६.२०२३.

प्रस्तावना :-

"राखीव वनाचे सर्व्हेक्षण, जमाबंदी व सीमांकन" (४४०६ ००५३) या राज्य योजनेअंतर्गत सन २०२३-२४ साठी एकूण रु. ८०००.०० लक्ष (०२- मजूरी रु. १३६०.०० लक्ष, २७ - लहान बांधकामे रु. ३६८०.०० लक्ष व ५३- मोठी बांधकाम रु. २९६०.०० लक्ष) इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

२. वित्त विभागाच्या संदर्भ क्र. १ च्या परिपत्रकान्वये एप्रिल ते जून या पहिल्या तिमाहीसाठी २०% च्या मयादेत निधी वितरीत करण्यास मान्यता दर्शविलेली आहे.

प्रस्तुत योजनेअंतर्गत पुणे, औरंगाबाद, गडचिरोली, कोल्हापूर, धुळे व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) प. मुंबई वनवृत्तासाठी आवश्यक एकूण ३५५.१७ लक्ष निधी वितरीत करण्याबाबचा प्रस्ताव प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र. २ व ३ च्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे.

३. हे पहाता, सदर लेखाशिर्षा अंतर्गत अर्थसंकल्पित केलेल्या एकूण रु. ८०००.०० लक्ष निधीपैकी वित्त विभागाचे उक्त परिपत्रक व बी.डी.एस. प्रणालीवर उपलब्ध निधीच्या अधीन २०% निधी म्हणजेच रु.१३०४.०० लक्ष (०२- मजूरी रु. २७२.०० लक्ष, २७ - लहान बांधकामे रु. ७३६.०० लक्ष व ५३-मोठी बांधकाम रु. २९६.०० लक्ष) निधी वितरणासाठी उपलब्ध आहे. सदर उपलब्ध निधीतून क्षेत्रिय विभागाने मागणी केलेल्या उक्त एकूण रु. ३५५.१७ लक्ष निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:-**

सन **२०२३-२४** करिता "राखीव वनाचे सर्वेक्षण**,** जमाबंदी व सिमांकन" (**४४०६ ००५३)** या योजनेअंतर्गत उपलब्ध निधीतून एकुण **रु.३५५.१७ लक्ष** (०२- मजूरी रु. ५६.४० लक्ष, २७ - लहान बांधकामे रु. १८५.१७ लक्ष व ५३-मोठी बांधकाम रु. **११३.६** लक्ष) निधी पुढील तपशिलानुसार तसेच अटींच्या अधीन राहून खर्च करण्यास मंजूरी देण्यात येत आहे :-

| **अ.क्र.** | **वनवृत्त** | **कामाचा तपशिल** | **वितरित रक्कम (लक्ष)** |
|---|---|---|---|
| १ | पुणे | वनजमिनीचे DGPS सर्व्हे. | ३४.१७ |
| ३ | गडचिरोली | Construction class \|& \|\| Boundary pillars | १३.९४ |
| २ | प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) मुंबई | Construction class \|& \|\| Boundary pillars. | ८१.८७ |
| ३ | औरंगाबाद | शहर हद्दीतील वनजमिनीचे DGPS सर्व्हे व सिमांकन करुन पिलर्स लावणे.. | ८९.६८ |
| ४ | कोल्हापूर | Construction class I & II Boundary pillars | ६२.६० |
| ५ | धुळे | वनहद्दीवर सिमेंट कॉंक्रेट पिल्लर्स लावणे | ७२.९१ |
| | **एकूण** | | **३५५.१७** |

१) ज्या प्रयोजनासाठी खर्चास मंजूरी देण्यात आली आहे, त्याच प्रयोजनावर निधी खर्च करण्यात यावा
२) या मध्ये कोणत्याही प्रकारची वित्तिय अनियमितता होणार नाही, याची पुरेपूर दक्षता घेण्यात यावी.
३) वित्त विभागाने दिनांक ११/७/२००१ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या वित्तिय मर्यादा यापुढेही लागू राहतील.
४) सदर मान्यता ही आर्थिक वर्ष २०२३-२४ या कालावधी करिताच देण्यात येत आहे.
५) सदर बांधकाम करताना वन (संवर्धन) अधिनियम, १९८० चा भंग होणार नाही, याची दक्षता घ्यावी
६) खर्चाच्या अनुषंगाने उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात यावे.
७) आर्थिक वर्षाअखेर वितरीत निधी आर्णि अखर्चित निधीची पडताळणी करण्यात येवून अखर्चित निधी तातडीने शासनखाती जमा करण्यात यावा.
८) निधी वितरीत करताना प्रस्तुत कामे दुबार होत नसल्याची खातरजमा करावी.

**२.** सदर खर्च हा मागणी क्रमांक- सी-१०, ४४०६ वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च राज्य योजनांतर्गत योजना वनाचे सर्वेक्षण, जमाबंदी व सिमांकन (४४०६-००५३) या शीर्षाखाली दर्शविण्यात यावा व सन २०२३-२४ मध्ये मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. निधी खर्च करताना वित्त विभागाने मासिक निधी विवरणपत्र तसेच इतर बाबतीत दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२.०४.२०२३ च्या मान्यतेने तसेच शासन निर्णय क्रमांक वि.अ.प्र.-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम /भाग-२, दिनांक १७/४/२०१५ भाग पहिला उप विभाग-३ परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०७०६१७२४५०८२१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

APARNA SUHAS UPASANI

Digitally signed by APARNA SUHAS UPASANI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=130a2ee40839d75ff18e93244499097828091ef8e09f856d6e8f0c403254f40a, pseudonym=3697F9C1859177438542B4E103592744309AD950, serialNumber=00DDF81FCF3DFD3E814E1C6D5D5D1249D28D65601EB04ECDFF837C158CB2ED4C, cn=APARNA SUHAS UPASANI
Date: 2023.07.06 17:26:30 +05'30'

( अपर्णा उपासनी )
**कार्यासन अधिकारी**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम मुंबई.
६) मुख्य वनसंरक्षक (प्रा.), पुणे/ कोल्हापूर /गडचिरोली/औरंगाबाद.
७) वनसंरक्षक (प्रा.), धुळे.
८) वनसंरक्षक तथा संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली.
९) मुख्य वनसंरक्षक (भूमी अभिलेख कक्ष), नागपूर.
१०) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
११) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१२) वित्त विभाग, व्यय १०/ अर्थसं-६ मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१३) कार्यासन अधिकारी (फ-२) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१४) कार्यासन अधिकारी, ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१५) निवडनस्ती, कार्यासन (फ-३), म.व.व.वि., मंत्रालय, मुंबई-३२.